महाराष्ट्र शिक्षण सेवा ( प्रशासन शाखा)
मधील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या- गट-अ
प्राचार्य

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली-३१२३/प्र.क्र ११४/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०१ ऑगस्ट, २०२३

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अंमलात आले आहेत. सदर अधिनियमातील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदीनूसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या लगतनंतरच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याच्या पूर्व मान्यतेने खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्याची विनंतीवरुन बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक-३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | डॉ.रामचंद्र तुकाराम कोरडे, प्राचार्य<br>जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, वेळापूर, जि.सोलापूर | जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था,<br>फलटण, जि.सातारा |

२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या आदेशाप्रमाणे बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०८०११२४७५६१६२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY NIVRUTTI BHOSALE

Digitally signed by VIJAY NIVRUTTI BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION ND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=c7a4e31cd0e0c9eec89f89869f2dd675d71f0636b0a2ea82e485826669926889, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7966FB8DA6E03C3F79409670C65FAC077378A68F734A11D051D02DC3119DC128, cn=VIJAY NIVRUTTI BHOSALE
Date: 2023.08.01 12:48:59 +05'30'

( विजय भोसले )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सर्व शिक्षण संचालक.
३) संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक
४) संबंधित शिक्षणाधिकारी (माध्यमिक/प्राथमिक/योजना) जिल्हा परिषद

५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६) संबंधित अधिकारी ( शिक्षण आयुक्तालयामार्फत )

**प्रत माहितीस्तव**

१.मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. सर्व सह सचिव/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई